राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), पालघर कार्यालयातील सांख्यिकी सहायक या १ अस्थायी पदाला मुदतवाढ मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः कुनिका-२०१८/प्र.क्र.२३५/आरोग्य-५**

१० वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत,

मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

तारीख: १२ मार्च, २०२४

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. पदआ-२००७/११७/प्र.क्र.१९/सेवा-१, दि.०६/०८/२००७
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. क्षनिका/अस्थाई पदे २०१०/ प्र.क्र.३०५/ आरोग्य-५, दि.२१/०४/२०११
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन शुध्दिपत्रक क्र. क्षनिका/अस्थायी पदे २०१०/ प्र.क्र.३०५/आरोग्य-५, दि.०९/०६/२०११
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१८/प्र.क्र.४० (भाग-२)/आ-३, दि.२३/०५/२०१८
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०२०/प्र.क्र.४४/आ-३, दि.०७.०६.२०२१
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. कुनिका/अपदे-२०१८/प्र.क्र.२३५/ आरोग्य-५, दिनांक २६/१०/२०२३
७) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/०२/२०२४
८) सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग), पुणे-१ यांचे पत्र क्र.ससंआसे/ आमाजीआ/०१ अस्थायी पद /कक्ष५२ब /न.क्र६६६ /२६३४-३६/२४, दि.०५/०२/२०२४

प्रस्तावना :-

राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत दि. २३/०५/२०२१८ च्या शासन निर्णयान्वये सहायक संचालक, आरोग्य सेवा, पालघर येथील कार्यालयातील १६ अस्थायी पदे निर्माण केलेली

आहेत. तसेच, संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), पालघर यांचे कार्यालयात सांख्यिकी सहायक हे १ अस्थायी पद नवीन निर्माण केलेले आहे. सदर सांख्यिकी सहायक या अस्थायी पदाला दि.०१/०९/२०२३ ते दि.२९/०२/२०२४ पर्यंत संदर्भ क्र.६ येथील दि.२६/१०/२०२३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. आता, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), पालघर येथील कार्यालयातील सांख्यिकी सहायक या अस्थायी पदाला दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग), पुणे-१ यांच्या संदर्भ क्र.८ येथील प्रस्तावास अनुसरून, सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग), पालघर यांचे कार्यालयातील सांख्यिकी सहायक (एस-१३ ३४५००-११२४००) या १ अस्थायी पदाला दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर पदांचा खर्च खालील नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२४-२५ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१

२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६-सार्वजनिक आरोग्य

१०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण

(१) (०१०)- कुष्ठरोग नियंत्रणासाठी पथके व रुग्णालय

सांकेतांक (२२१० ०६६५) (योजनेतर)

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या, दि. २१/०२/२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०३१२१०५२५५३७१७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH GURULING HANSHETTI

Digitally signed by MAHESH GURULING HANSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d541c6ddf0221a38b5bf17bde071c16e4fc5d59c6c056a12206b90f86b0b039, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B2EDCC53DBB4AA0ABD5E56CEB34FAF620B051435FE8057488BAB1D4B20721FD1, cn=MAHESH GURULING HANSHETTI
Date: 2024.03.12 12:10:47 +05'30'

**(महेश हंशेट्टी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई/पुणे.
६. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन) मुंबई.
८. सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग), पुणे.
९. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे.
१०.उपसंचालक, आरोग्य सेवा, मंडळे (सर्व)
११.सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) (सर्व).
१२.प्रशासक, डॉ.बंदोरवाला कुष्ठरोग रूग्णालय, कोंढवा, पुणे.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१४. वित्त विभाग (व्यय-१३), (अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव,( सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. निवडनस्ती (आरोग्य-५)